## त्रिवेणी बद्दल गुलज़ार म्हणतात..

तसं पहायला गेल्यास त्रिवेणी फार सोप्पा काव्यप्रकार आहे, तीन ओळींचा. पण एक अट आहे, अगदी लहानशी. पहिल्या दोन ओळीत एक विचार मांडला जायला हवा. गझल च्या शेर सारखाच तो विचार परीपुर्ण व्हायलाच हवा. तिसरी ओळ कवडश्या सारखा प्रकाश टाकून जायला हवी ज्याने पहिल्या दोन ओळींना एक वेगळा अर्थ मिळेल किंवा त्यांच्या अर्थात भर पाडेल. त्रिवेणी तसा नाजुक प्रकार आहे . हे योगासन मी करुन दाखवु शकतो पण सांगता येणं कठीण आहे.

त्रिवेणी ही कविता नाही आहे, ना हायकू, ना ही तीन ओळींचा मुक्त छंद ह्या तीन्ही काव्यप्रकारात जर तीन ओळी असतील तरीही त्या एकाच अर्थाच्या असतात, अन् ईथेच त्रिवेणी इतर काव्यप्रकारांहुन वेगळी आहे त्रिवेणीतली तिसरी ओळ कधी पहिल्या दोन ओळींच्या अर्थात भर पाडते तर कधी त्यांना वेगळा दृष्टिकोन देते तर कधी त्यांच्या अर्थावर comment करते. त्रिवेणी नाव ह्या साठी दिलंय की इथे तीन नद्यांचा संगम होतो. गंगा, जमुना आणि सरस्वती. गंगा आणि जमुना आपल्याला दिसतात जमिनीवर वाहताना. पण सरस्वती .. जी तक्षशीले कडून वाहात येते ती गुप्त आहे ..त्रिवेणीच्या तिस-या ओळीचं काम आहे ही सरस्वती दाखवणं जी पहिल्या दोन ओळीत गुप्त आहे.

गुलज़ार

# प्रस्तावना..

“त्रिवेणी म्हणजे तीन ओळींची कविता!”

असा सरधोपट अर्थ जो लावतो त्याने ह्या भानगडीत पडूच नये.

गझल लिहीणा-यास ..हे वृत्त तसे सोपे आहे पण ही वृत्ती सर्वांना लाभत नाही.. त्यासाठी एक तिसरा डोळा लागतो. दोन ओळीतला मूड तिस-या ओळीने बदलावा हा संकेत आहे पण पहिल्या दोन ओळीत व्यक्त झालेला विचारही तितक्याच ताकदीचा असावा ..हे सामर्थ्य आहे. गुलजारजींचेच उदाहरण घ्यायचे झाले तर

जिंदगी क्या है जानने के लिये

जिंदा रहना बहोत जरुरी है

.

.

.

आज तक कोई भी रहा तो नही

इथे तिस-या ओळीच्या प्रकाशात पहिल्या दोन ओळींचा शेर एक नवीन रंगछटा दाखवून जातो.

मराठीत हा काव्यप्रकार नवा आहे. गुलजार यांच्या त्रिवेण्यांचे शांता शेळके यांनी केलेले रुपांतर वगळता मराठीत त्रिवेणी संग्रह ऐकिवात नाही.

तेव्हा मकरंदच्या त्रिवेण्या हा बहुदा मराठीतला पहिला स्वरचित त्रिवेणी संग्रह. मराठी काव्यसृष्टीत एक नवा काव्यप्रकार आणल्याबद्दल कवी मकरंद सावंत यांचे मनापासून आभार.

मकरंदच्या त्रिवेण्या चे वैशिष्ट्य म्हणजे त्यातील सहजता

ते म्हणतात तस होईल सुद्धा

राम राज्य येईल सुद्धा

.

.

काळजी वाटते ती सीतेची

वाचताना जाणवतं की हे काहीतरी निराळं आहे. इथे सर्व ओळी ह्या विषयाच्या अभिव्यक्तीच्या गरजे साठी आहेत¤ दोन ओळींचा सरळ मार्ग अन तिसऱ्या ओळीची तिरकी चाल ¤इथे लगाम धरणा-या हातांचे कसब लक्षात येते

आल्हाद महाबळ यांनी ह्या पुस्तकात स्वतःच्या photographs ने पुस्तकाच्या देखणे पणात भर टाकली आहे ,मंदार चोळकर यांनी बनवलेले cover सुद्धा फार बोलके आहे

हल्ली लहान लहान कवितांची छोटी छोटी पुस्तक फोफावतायत चारोळ्या तर पाचोळ्या सारख्या विखुरल्यातपण दर्जा ह्या कसोटीवर हा त्रिवेणी संग्रह फार निराळा आहे.. इथे एक ही त्रिवेणी टाकाऊ नाही. प्रत्येक त्रिवेणी वाचकाच्या विचारांना चालना देते. मराठी काव्यसृष्टी ह्या नव्या काव्यप्रकाराचं स्वागत करेल व गुलजारजींच्या बागेतले हे “कलमी रोप” जे कवी मकरंद सावंत ह्यानी ह्या मराठी मातीत रुजवलं त्यावर अनेक काव्यपुष्प उमलतील ही सदिच्छा

समीर सामंत

Sameer Samant

22nd Nov. 2009

आसवांना परतवायचे लाख बहाणे केले

पण तेही तुझ्या सारखेच निघाले

.

.

.

ते जात नाहीत तू येत नाहीस



तिला सांगा आता मी कविता लिहित नाही

तिला सांगा आता मी गात ही नाही

.

.

.

तिनेच सांगितलं होतं, गप्प बस.



चिखलाच्या पोळ्या थापत बसलेलं पोर

डोक्याला हात लाउन बसलेली माय

.

.

.

चिखलाच्या पोळ्या खाता येत नाहीत ना !




तुझ्या जाण्याने कुरतडून गेलेत
काळे पडलेत.. सुकून सुकून
.
.
.
माझ्या ओठांना सवय झाली होती तुझी




लोकांचे धक्के , गलिच्छ गर्दी

सिगरेटचा वास, तुंबलेली गटारं

.

.

तू ट्रेन मधुन उतरताच सगळं जाणवायला लागलं


सगळेच वेड्या सारखे वागतायत
तो चंद्र बघ दुपार झाली तरी आहे अजून आकाशात
.
.
तू मोग-याचा गजरा नको घालत जाऊ गं.


माझ्या प्रत्येक भागात वाटेकरी आहेत
माझं आयुष्यही वाटून घेतलंय त्यांनी
.
.
.
दुःख वाटायची तेवढी राहिली
Makrand S. Sawant


आज तिचा ना एक mssd call आला
ना एखादा sms ही
.
.
.
आजचा दिवस फुकट


तिच्या वाटा सोशिक राकट
अन\ मला उन्हाचा त्रास
Makrand S. Sawant
तुझ्या पदराखाली पुन्हा घे गं आई

मला scrap करायला आवडतात




मला orkut आवडतं

•

•

इथे ID असतो जात नसते

तू मोजून ठेवल्यास माझ्या खाणाखुणा

शपथा, स्वप्न, मिठ्या सर्व सर्व

.

.

.

फार हिशोबी आहेस तू





चिमटीत पकड सूर्याला

अन् अलगद ठेव

.

.

.

तुझ्या कपाळी शोभतो तो


काल चंद्र आला होता
बराच वेळ गप्पा मारल्या आम्ही
.
.
.
लोक वेडे आहेत म्हणतात अमावस्या होती
Makrand S. Sawant


कुत्र्याचं जीनं सालं मोत बरी की रं उस्मान?
रस्त्या वयलं जगनं काटत राम म्हनाला
.
.
इथे नांदते एकात्मता


तिच्या कपाळीचं कुंकू न्हेलत
आमचा चंद्र सुद्धा हिरावून न्हेलात
तुम्ही गेलात तेव्हा अमावास्या होती पप्पा
Makrand S. Sawant


आठवतंय तू म्हणालेलीस
तुला दिवसातून १ तास तरी फोन करेन
त्या तासांची वर्षं झालीत आता तरी ये


बेहोशीच्या बाहुलीला कडेवर घेऊन आत शिरलं का काय कळतंय
जाडी कुठली, बारीक कुठली, काळी कुठली, गोरी कुठली
.
.
.
ती सीता असावीच पन मी काय राम हाय व्हय?
Makrand S. Sawant



देऊळ रिकामं रिकामं वाटत

असं वाटत देव निघून गेलाय

.

.

.

काल तू इथेही आलेलीस का गं?

भगवद्गीतेत छान सांगितलंय

मोक्ष म्हणजे काय?

.

.

.

तुझ्या ओठांची चव पुन्हा रेंगाळली ओठांवर




थोरल्याला लाकडाचं कपाट अन चुलीची खोली
छोट्याला मागची पडवी. अन ओटा
आता आई बाप कापून वाटून घ्या.


आता त्याने कुबड्या टाकल्या
मुक्त केलं स्वतःला
.
.
.
काल म्हणे रुळावर तुकडे होते त्याचे
Makrand S. Sawant

धोंडो भिकाजी जोशी..मु. पो. कडमडे,

खपाटीला गेलेलं पोट लपवणारा अंतु बर्वा

.

.

नाही, देवाला जमल्या नसत्या ह्या वल्ली म्हणुन पु.लं झाले


आता मेलो तरी हरकत नाही
तिच्या तोंडून एवढच ऐकायच होतं
Makrand S. Sawant
“ काल रात्री तू माझ्या स्वप्नात आलेलास ”


अशी कुशीत ये फाटक्या पदरानं आभाळ सांध माझं
अन आसवात रुजव बीज उद्याचं तुझ्या कुशीत
.
.
.
काही हनीमुन असेच असतात


ते म्हणतात तसं होईल सुद्धा
पुन्हा राम राज्य येईल सुद्धा
काळजी वाटते ती सीतेची
Makrand S. Sawant


तुला लावलं, मला लावलं
गुलजारला लावलं.. ज्ञानेश्वरांनाही लावलं
वेड लावतो ..वेड लावतो मोगरा


आसवांना केव्हाच केलंय अलविदा
वेदनेचं गाव आता फार लांब राहीलंय
.
.
तू जवळ आलीस ना आता
Makrand S. Sawant


तुझ्या आठवणीची जागा माझ्या कुशीत आहे
कवटाळून निज येते मला तुझी आठवण
.
.
.
तू नसलीस की तीच तर जवळ असते
Makrand S. Sawant


त्या लिमलेटच्या गोळ्यांसोबत
त्या कागदाच्या होड्यांसोबत
.
.
.
बरंच काही वाहून गेलं ना.

सावल्यांशी खेळताना सांज झाली

आता पुन्हा दिवे लागतील

.

.

पुन्हा मी एकटा पडेन




तू काळोखाला घाबरतेस असं ऐकलं बस
सूर्याशी बोलून आलोय मी
आता रात्र नाही होणार


पुन्हा तिला एकटं सोडून तो निघून गेला
काजळाची रेघ ओढून तो निघून गेला
.
.
विस्कटल्या कपाळाने आता ती कुठं जाईल?
Makrand S. Sawant

मकरंद सावंत यांच्या हिंदीतील त्रिवेण्या वाचण्यासाठी

तसेच आपला बहुमोल अभिप्राय कळवण्यासाठी संपर्क साधा..

**esahity@gmail.com**

makrandluvesluv@gmail.com

किंवा

☎ ९९६७०८४८८५



ई साहित्य प्रतिष्ठान

ती टाळते मला समोरासमोर भेटणं
तरीही कविता सर्व वाचते माझ्या
.
.
.
तिला म्हणे मला कवितेत भेटायला आवडतं